शासनाकडे स्वयंस्पष्ट व परिपूर्ण प्रस्ताव
पाठविण्याबाबत मार्गदर्शक सूचना.

---

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
परिपत्रक क्रमांक:-एमआयएस-०१९९/२४(७४)/पीआरएस-२
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक:- २१ ऑक्टोबर, १९९९.

<u>प्रस्तावना:-</u> शासनाकडे प्राप्त होणा-या प्रस्तावांचे अवलोकन करता असे निदर्शनास आले आहे की, कारागृह महानिरीक्षणालयाकडून प्राप्त होणारे प्रस्ताव स्वयंस्पष्ट व परिपूर्ण असल्याचे दिसून येत नाहीत. त्यामध्ये अनेक त्रुटी/उणीवा असतात. त्यामुळे अनेक प्रकरणांचा निपटारा कमी कालावधीत होत नाही व परिणामी अनेक प्रकरणांवर वेळीच कार्यवाही न झाल्यामुळे ती शासन स्तरावर प्रलंबित रहातात. यास्तव याबाबत काही "सविस्तर मार्गदर्शनात्मक सूचना" देण्याबाबत शासनाचा विचार चालू होता :-

<u>परिपत्रक</u>

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे शासनाकडे पाठविण्यांत येणारे प्रस्ताव स्वयंस्पष्ट व परिपूर्ण स्थितीत प्राप्त होणे आवश्यक असल्यामुळे प्रस्तावांमध्ये पुढील बाबींचा समावेश होणे आवश्यक आहे.

प्रस्तावांच्या स्वरुपांप्रमाणे प्रस्ताव पाठवितांना पुढील बाबींचा विचार करण्यांत यावा.

<u>(१) सर्वसाधारण स्वरुपाचे प्रस्ताव:-</u>

(१) प्रस्ताव सादर करताना आवश्यकतेनुसार पूर्वोदाहरण (precedent) किंवा तत्सम प्रकरणाचा (similar case) प्रस्तावात उल्लेख करावा.तसेच प्रत्येक मुद्याबाबत खुलासा /समर्थन /स्पष्टीकरण प्रकर्षाने सादर करण्यात यावे.

(२) विषयांकित कामकाजाबाबत प्रचलित व विहीत पध्दतीने कार्यवाही करण्यांत येत असल्याचे स्पष्टपणे नमूद करावे.

(३) प्रस्तावात कारागृह महानिरीक्षक,कारागृह महानिरीक्षणालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्या मान्यतेने प्रस्ताव पाठविण्यांत आला असल्याबाबत उल्लेख करणे आवश्यक आहे. तसेच कारागृह महानिरीक्षक यांना असलेल्या अधिकारात प्रस्तावाधीन बाबी बाबत निर्णय का घेता येत नाही याचा खुलासा व समर्थन आवश्यक आहे.

(४) शासनाच्या कोणत्या नियमांनुसार/आदेशांनुसार (यथास्थिती) प्रस्ताव सादर करण्यांत आला आहे ते नमूद करावे व आवश्यकतेनुसार त्यांच्या प्रतीही प्रस्तावासोबत सादर करण्यांत याव्यात.

(५) विषयांकित कामकाजाबाबत/प्रस्तावाधीन कामाबाबत तातडीने कार्यवाही करण्याची आवश्यकता आताच का आहे, ते स्पष्ट करण्यांत यावे.

(६) प्रस्तावाधीन कामासाठी आवश्यक पुस्तके/नियम कार्यालयात उपलब्ध नसतील तर यापूर्वी अन्य तत्सम प्रकरणी कार्यवाही कशी करण्यांत येत होती , याबाबतची माहिती आवश्यकतेनुसार व यथास्थिती सादर करण्यात यावी.

(७) सुरु करण्यात आलेल्या प्रकरणाच्या अनुषंगाने आवश्यकतेनुसार व टप्प्याटप्प्याप्रमाणे प्रकरणाच्या प्रगतीच्या सद्य:स्थितीची माहिती शासनास पाठविण्यांत यावी.

(८) शासन स्तरावर कार्यवाही पूर्ण करण्यांत आल्यानंतर शासनाच्या आदेशांच्या अनुषंगाने "कार्यपालन अहवाल" शासनास तात्काळ/विहित कालावधीत पाठविण्यांत यावा.

(९) प्रस्ताव क्रियाशील विचारप्रणालीचा अवलंब करुन सादर करण्यांत यावा.

(१०) सर्व प्रस्ताव/ पत्रे कारागृह महानिरीक्षणालय,महाराष्ट्र राज्य,पुणे या कार्यालयामार्फतच सादर करण्यांत यावेत.

(११) वारंवार स्मरणपत्रे पाठविण्याची आवश्यकता नसावी.

**(२) वित्तीय बाबींशी संबंधित प्रस्ताव :-**

(१) प्रस्तावाधीन खर्चाशी संबंधित "लेखाशीष" नमूद करण्यांत यावे.

(२) खर्चाचा सविस्तर तपशील देण्यांत यावा.

(३) आवश्यकतेप्रमाणे सुधारित दर/किंमती कळविण्यांत याव्यात.

(४) खर्च वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविणे शक्य आहे किंवा कसे ते प्रस्तावात नमूद करण्यांत यावे.

(५) आवश्यकतेनुसार गेल्या ५ वर्षांची आकडेवारी सादर करण्यांत यावी.

(६) रक्कम अदा करण्याबाबतच्या प्रकरणाबाबत कार्यपालन अहवाल सादर करताना "कोषागार प्रमाणक क्रमांक" व त्याबाबतची माहिती सादर करण्यांत यावी.

(७) खरेदीचा प्रस्ताव असेल तर त्यामध्ये विहीत पध्दतीने खरेदी करण्यांत येत आहे किंवा कसे, ते नमूद करण्यांत यावे. उदा. स्पर्धात्मक निविदा पध्दतीचा अवलंब करण्यांत आला आहे किंवा कसे १

(८) विषयांकित कामासाठी खर्च कसा करण्यांत येणार आहे१

(९) विषयांकित कामासाठी एकूण खर्च किती येणार आहे१

(१०) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास रक्कम अदा करावयाच्या प्रस्तावांसोबत "देयकाच्या मूळ प्रती व सत्य प्रती" सादर करण्यांत याव्यात.

**(३) कार्योत्तर मंजुरी / मान्यता ( Expost Facto sanction / Approval)**

**बाबत प्रस्ताव :-**

(१) कार्योत्तर मंजुरीबाबतच्या प्रकरणी पूर्वमंजुरी न घेता कार्यवाही करण्याइतकी तातडीची गरज असल्यास त्याच्या स्पष्टीकरणासह प्रस्ताव सादर करण्यात यावा.

(२) सदर प्रस्ताव तातडीची बाब म्हणून हाती घेतला तर तो शासनाच्या मान्यतेसाठी ज्यावेळी सादर करण्यात येईल त्यावेळी प्रस्ताव शासनाकडे सादर करण्याची कारणे स्पष्टीकरणासह नमूद करावीत.

(३) अशा प्रकरणी वित्त विभागाच्या मार्गदर्शक तत्वांनुसार शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-एफएनआर-१०६६/ १२११९४४/ २६६/रोमन-७, दिनांक १६.२.१९६६ अनुसार विहित केल्यानुसार कार्योत्तर मंजुरीच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने सदर परिपत्रकातील परिच्छेद-३ मधील अ.क्र.१ ते ७ मुद्यांबाबत माहिती शासनास प्रस्तावासोबत पाठविणे आवश्यक आहे.

**(४) नियमात सुधारणा करण्याबाबत प्रस्ताव (Amendments) तसेच न्यायालयीन प्रकरणे व राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाबाबतची प्रकरणे:-**

(१) प्रस्तावात नुसते नियमात सुधारणा करण्यांत यावी, असे नमूद न करता अस्तित्वात असलेल्या नियमांच्या शर्तीसह उल्लेख व त्यासमोर सुधारणा याप्रमाणे नियम व

कायदेविषयक मुद्दा उपस्थित करुन प्रस्ताव सादर करण्यांत यावा.सुधारणा करण्याबाबतच्या अधिसूचनेच्या मसुद्यासह प्रस्ताव शासनास पाठवावा. तसेच प्रत्येक बाबील सुधारणा करणे आवश्यक आहे याचे समर्थन देण्यात यावे.

(२) असा प्रस्ताव सादर करण्याबाबत (The rules for the conduct of the legal Affairs of the Govt. 1984) ( दि रुल्स फॉर दि कौंडक्ट ऑफ दि लिगल अफेअर्स ऑफ दि गव्हर्नमेंट,१९८४) या नियमांप्रमाणे कार्यवाही करण्यांत यावी.व त्याप्रमाणे संबंधित प्रस्तावामध्ये त्यांचा उल्लेख करण्यात यावा.

(३) न्यायालयीन प्रकरणांबाबत व राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाबाबत च्या प्रकरणांबाबत तात्काळ माहिती पाठवावी लागते. याबाबत आवश्यक ती काळजी घ्यावी.

तथापि उपरोक्त परिच्छेदांत नमूद केलेल्या सूचनेच्या संदर्भात असेही लक्षात आणून देण्यांत येत आहे की, उपरोक्त बाबींचा समावेश प्रस्तावात करुन तो सादर केला म्हणजे प्रस्ताव हमखास व लवकर मान्य होईलच असा याचा अर्थ गृहीत धरण्यांत येऊ नये. मात्र यामुळे शासन स्तरावर कार्यवाही करणे काही प्रमाणात सुलभ होईल व त्यामुळे प्रकरणांचा निपटारा विहित कालावधीत होऊ शकेल.

तरी यापुढे प्रस्ताव सादर करताना उपरोक्त सूचनांचे पालन अवश्य करण्यांत यावे.व शासनाकडे प्रस्ताव पाठवितांना ते " स्वयंपूर्ण व परिपूर्ण " स्वरुपात पाठविण्यात येतील, याबाबत आवश्यक ती काळजी घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( गु.ज.कुळकर्णी )
कक्ष अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक,कारागृह महानिरीक्षणालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक, ( मुख्यालय) पुणे /पश्चिम विभाग, पुणे/ मध्य विभाग, औरंगाबाद / पूर्व विभाग, नागपूर / दक्षिण विभाग, मुंबई.
सर्व अधिक्षक,महाराष्ट्रातील सर्व कारागृहे.
निवड नस्ती.